महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२१/प्र.क्र.११८/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एमकेएसपी-२०१३/प्र.क्र.२६६/ योजना-३, दिनांक १७ डिसेंबर, २०१३.
२. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.के-११०११/०९/२०१६/एमकेएसपी/ एएपी/महा, दिनांक ०४ ऑगस्ट, २०१६ चे वितरण आदेश.
३. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.के-११०११/४६/२०११/एमकेएसपी/ एमएएच, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७ चे वितरण आदेश.
४. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मजिअ-२०२०/प्र.क्र.९४/योजना-३, दिनांक २३ फेब्रुवारी, २०२१.
५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीजीटी-२०२०/प्र.क्र.२१/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०९ डिसेंबर, २०२१.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एमएसआरएलएम/लेखा/ २२१३/२०२०, दिनांक १४ ऑगस्ट, २०२०.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एमएसआरएलएम/लेखा/ १४७३/२०२१, दिनांक ०६ जुलै, २०२१.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी संदर्भ क्र.३ व ४ अन्वये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास महिला किसान सशक्तीकरण परियोजनेच्या अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य या योजनेकरिता रु.२,९१,४०,०००/- तसेच मे.स्वामीनाथन रिसर्च फौंडेशनसाठी रु.१५,१३,८००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या बँक खात्यात थेट जमा केला आहे. उपरोक्त केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा अनुक्रमे रु.१,९४,२६,६६७/- व रु.१०,०९,२००/- असा एकूण रु.२,०४,३५,८६७/- पैकी रु.१,९४,००,०००/- इतका निधी संदर्भ क्र.४ अन्वये वितरीत केला आहे. सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता राज्य हिस्सा (२५०१ ए१२८) याकरिता रु.१,००,००,०००/- इतकी

तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यामुळे सन २०१६-१७ मधील प्राप्त केंद्र हिस्सा समरुप उर्वरीत राज्य हिस्सा वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP)) राज्य हिस्सा (२५०१ ए१२८) याकरिता केलेल्या तरतूदीतून सन २०१६-१७ मधील प्रलंबित निधी रु.२६,६६७/- व मे.स्वामीनाथन रिसर्च फौंडेशनसाठी रु.१०,०९,०००/- असा एकूण रु.१०,३५,६६७/- (रुपये दहा लाख पस्तीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.१०,३५,६६७/- चा खर्च "मागणी क्र.एन-३, २५०१-ग्राम विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०५) महिला किसान सशक्तीकरण परियोजने अंतर्गत लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ ए१२८)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय तसेच साध्य झालेल्या भौतिक उद्दीष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

५. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली

रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २४ जून, २०२१ व दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.९२८/व्यय-१४, दिनांक २४.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२७१४११९५८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DILIP BABASAHEB PATIL

Digitally signed by DILIP BABASAHEB PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab277471707f6c88355be37b70bda72228dfe36fb01c0b5f8152a6d3ad3022fa, pseudonym=E96D61F7FACCEE19B6196702D3E9E4499C95F515, serialNumber=6721ACA60D5973C4D26547269488F4F9D7C98360213C1A8CA7ECCC36B35448FF, cn=DILIP BABASAHEB PATIL
Date: 2021.12.27 16:28:42 +05'30'

(दि. बा. पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-१४) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
८) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) निवडनस्ती.